15-1-1938.
5,000—6th Edition.

# DEPARTMENT OF PUBLIC INSTRUCTION BOMBAY

# मराठी सहावें पुस्तक

# MARATHI READING SERIES SIXTH BOOK

Price: 5 As. 6 P. 1 [ किंमत: ५ आ. ६ पै.

8



...BLISHED AT
THE B... ...ESS, MAZAGON, BOMBAY No. 10

15-1-1938.
5,000—6th Edition.

# DEPARTMENT
OF
# PUBLIC INSTRUCTION
# BOMBAY

# मराठी
# सहावें पुस्तक

## MARATHI
## READING SERIES
## SIXTH BOOK

Price: 5 As. 6 P. [ किंमत: ५ आ. ६ पै.

8



...BLISHED AT
THE B... ...ESS, MAZAGON, BOMBAY No. 10

Department of P... struction, Bombay

मुंबई इलाख्यांतील सरकारी शाळांतें

# मराठी

# सहावें पुस्तक

...जहाजें व आग...

व्हर्नॅक्युलर टेक्स्ट बुक्स रिव्हिजन कमिटीनें तयार केलें

---

# MARATHI

# SIXTH BOOK

PREPARED BY THE VERNACULAR TEXT BOOKS REVISION COMMITTEE

BOMBAY
GULAMHUSEIN AHMEDALLY & Co., Ltd.,
" THE BRITISH INDIA PRESS "

1938

Price 5 As. 6 Ps. ] [किंमत : ५ आणे. ६ पै.

15-1-1938
5,000—6th Edition.

# मराठी सहाव्या पुस्तकांतील धड्यांची अनुक्रमणिका.

| धड्याचें नांव. | पृष्ठ. |
|---|---|
| **भाग पहिला.** | |
| **सामान्य विषय.** | |
| १. आपलें त्रिविध कर्तव्य. | १ |
| २. दिल्ली. ... ... ... | ३ |
| ३. प्रभावती. ... ... | ७ |
| ४. देवाशीं सख्य. ( कविता. ) | ९ |
| ५. हिंदुस्तानांतील भाषा. ... | ११ |
| ६. मराठी भाषा. ... ... | १४ |
| ७. सोमदत्त वादळांत सापडला. | १७ |
| ८. हेंही गेलें आणि तेंही गेलें ! | १९ |
| ९. मराठी ग्रंथकारांस प्रार्थना. ( कविता. ) ... | २१ |
| १०. प्रवाळांचे खडप व बेटें. | २३ |
| ११. रोगकारक घरें व त्यांची सुधारणा. ... ... | २६ |
| १२. काशीयात्रा. ... ... | २९ |
| १३. संवयी आणि स्वभाव. ... | ३२ |
| १४. शिष्टसंप्रदाय. ... ... | ३४ |
| १५. हंस आणि नळराजा ( कविता. ) ... ... | ३७ |
| १६. आगगाडी. ... ... | ३९ |
| १७. समुद्र. ... ... ... | ४२ |
| १८. आंधळे व बहिरे-मुके ह्यांचें शिक्षण. ... ... | ४४ |
| १९. धाडस व साहस. ... | ४८ |
| २०. जन्मभूमि ( कविता. ) ... | ५१ |
| २१. जहाजें व आगबोटी. ... | ५३ |
| २२. मक्केची यात्रा. ... ... | ५६ |
| २३. मोतीं. ... ... ... | ५९ |
| २४. निंदा आणि चहाडी. ... | ६२ |
| २५. संपत्ति व तिचें उत्पादन. | ६४ |
| २६. नीतिपर अभंग ( कविता. ) | ६७ |
| २७. रामदास.... ... ... | ६९ |
| २८. राणीचा जाहीरनामा. ... | ७२ |
| २९. लंडन. ... ... ... | ७५ |
| ३०. कृतज्ञता.... ... ... | ७८ |
| ३१. आरोग्य व मद्यपान. ... | ८० |
| ३२. ईश्वराचें प्रातःस्तोत्र ( कविता. ) ... ... | ८३ |
| ३३. रानांचा संहार आणि रक्षण. | ८५ |
| ३४. वीरत्व. ... ... | ८८ |
| ३५. अभिमन्यु-वध ( कविता. ) | ९० |
| ३६. माझी गृहिणी. ... ... | ९२ |
| ३७. यंत्रांचा उपयोग. ... | ९५ |

## ह्या पुस्तकांतील प्रत्येक भागांतील धडे शिकविलेच पाहिजेत.

# भाग पहिला.

## सामान्य विषय.

### १. आपलें त्रिविध कर्तव्य.

आपलें पहिलें कर्तव्य ईश्वरासंबंधाचें होय. ईश्वरानें ही अनंत सृष्टि रचिली आहे. तिजमधील नानाविध चमत्कार पाहाण्यास इंद्रियें व त्या चमत्कारांचें वास्तविक स्वरूप कळून येण्यास बुद्धि त्यानेंच आपणांस दिली आहे. खरेंखोटें, सुरूपकुरूप, उदात्त-नीच, ह्यांमध्यें ईश्वराच्या कृपेनेंच आपणांस निवड करतां येते. ह्या प्रसादाबद्दल ईश्वराचे आपण अत्यंत ऋणी असलें पाहिजे; आणि ईश्वरप्रणीत ग्रंथांवरून, साधुसंतांच्या वचनांवरून किंवा आपल्या मनोदेवतेच्या प्रेरणेवरून ईश्वराच्या ज्या आज्ञा आपणांस समजून येतात, त्यांस अनुसरून आपण वागलें पाहिजे. ज्ञान मिळविण्याचीं व कर्में करण्याचीं साधनें ईश्वरानें जरी आपणांस दिलीं आहेत, तरी त्यांच्या योगानें आपणांस पूर्ण ज्ञान प्राप्त होतें किंवा पूर्ण कर्तृत्वशक्ति येते, असें नाहीं; उलट, विचाराअंतीं आपणांस असें आढळून येईल कीं, आपलें ज्ञान अत्यंत अपूर्ण व आपली कर्तृत्वशक्ति अत्यंत मर्यादित आहे. आजपर्यंत पुष्कळ विद्वानांनीं अवलोकन, प्रयोग व यंत्रें ह्यांच्या साहाय्यानें सृष्टींतील व्यापारांचे व चमत्कारांचे शोध केले आहेत, तरी कितीतरी व्यापार व चमत्कार त्यांच्या मतीस अद्यापि अगम्य राहिले आहेत ! कांहीं चमत्कार तर असे आहेत कीं, त्यांच्यापुढें मनुष्याची मति कुंठित व्हावयाचीच; निदान आजपर्यंत

येत नाहींत. म्हणून स्वच्छता, व्यायाम व युक्ताहार ह्यांनीं आरोग्य संपादणें, सच्चरित्रांच्या वाचनानें व मननाने सद्वासना वृद्धिंगत करणें, शिक्षणाच्या द्वारें बुद्धीचा विकास करणें आणि उद्योग करून पैसा मिळविणें व कुटुंबाचें पोषण करून आप्तांचा परामर्ष घेणें, हें आपलें **तिसरें कर्तव्य** आहे.

ह्या त्रिविध कर्तव्यास जागणारे अनेक सत्पुरुष ह्या पृथ्वीच्या पाठीवर होऊन गेले. अशांचें आपल्याकडील उत्तम उदाहरण म्हटलें म्हणजे भगवद्भक्त **एकनाथ** ह्यांचें होय. त्यांनीं इतर लोकांप्रमाणें संसार केला, भेदाभेद न करितां हरएक प्रसंगीं लोकांवर उपकार केले आणि अनन्यभावानें व निष्कामबुद्धीनें ईश्वरभक्ति केली. **जॉर्ज वॉशिंग्टन** हादेखील अशाच प्रकारचा पुरुष **अमेरिकें**त होऊन गेला. यानें उत्तम रितीनें संसार केला, आपल्या देशबांधवांच्या उपयोगीं पडण्याकरितां कित्येक वर्षें शारीरिक व मानसिक क्लेश भोगिले आणि प्रेमळ मनानें ईश्वरभक्तिही केली. अशा पुरुषांचें उदाहरण सर्वांनीं आपल्यापुढें ठेवावें व त्याप्रमाणें वागण्याचा यत्न करावा, म्हणजे ह्या जगांतील कर्तव्यें त्यांस चांगलीं बजावितां येतील.

---

## २. दिल्ली.

**दिल्ली** हें शहर **यमुने**च्या पश्चिम तीरावर वसलें आहे. पृथ्वीच्या पाठीवर **रोम**शहरावांचून **दिल्ली**इतकें इतिहासप्रसिद्ध शहर दुसरें नाहीं. एथें जवळच **पांडवां**च्या **इंद्रप्रस्थ** नामक राजधानीच्या खुणा सापडतात. **पांडवां**नंतर **आर्य** राजेच **दिल्ली**स राज्य करीत होते; त्यांपैकीं **धव**राजा इसवी सनाच्या चौथ्या शतकांत एथें होऊन गेला. त्यानें पन्नास फूट उंचीचा व चार फूट घेराचा असा एक लोखंडाचा ओतीव

ती फारच सुंदर आहे. जुम्मा मशिदीच्या पायऱ्या फार भव्य आहेत. तींतील बरेंच काम संगमरवरी दगडाचें आहे. चार कोनांला चार बुरूज आहेत. चांदणी चौक म्हणून एक मोठा राजमार्ग



चांदणी चौक—दिल्ली.

दिल्लींतून गेला आहे व त्याच्या मध्यभागीं झाडांची रांग आहे. शाहाजहानाच्या व औरंगजेबाच्या कारकीर्दींत दिल्ली नगरीस भव्य स्वरूप येऊन तिचें वैभव कळसास पोहोचलें. पण पुढें तिला वाईट दिवस आले.

सन १७३९ मध्यें नादिरशाहानें महमदशाहाचा पराभव करून दिल्ली हस्तगत करून घेतली. त्या वेळींही तिजवर तैमुरलंगाच्या वेळेसारखा दुर्धर प्रसंग ओढवला ! दिल्लीचे बादशाह वजिरांच्या ताब्यांत जाऊन नामधारी बनले होते. घातपात चालूच होते. एका